राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत प्रशिक्षण
कार्यक्रमासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३११/नवि-२०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

वाचा:- १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र. ३११/नवि-२०, दिनांक ११.०८.२०१६
२) शासन शुध्दीपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३११/नवि-२०, दिनांक २९.१०.२०१६
३) शासन पत्र, नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०१६/प्र.क्र.३४० (भाग-२)/नवि-१४, दिनांक २२.०७.२०१६
४) वरिष्ठ प्रशासन नि लेखाधिकारी, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यावस्थापन प्रशिषण संस्था, नागपूर यांचे पत्र क्र. वनामती/सीपीटिपी/लेखा-१/२०१७/११८, दिनांक १७.०१.२०१७

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन शासन निर्णय, नगर विकास विभाग,दिनांक ११.०८.२०१६ अन्वये सीपीटीपी-३ चे प्रशिक्षणार्थी गट-ब अधिकारी मुख्याधिकारी यांचे सिमीत कालावधीचे दिनांक २७.०६.२०१६ पासून ३० दिवसांच्या प्रशिक्षणावरील रू. १,००,८०,०००/- इतक्या खर्चास मंजूरी देण्यात आली आहे. सदर प्रशिक्षण दिनांक २९.०७.२०१६ (म.नं.) पर्यंत ३ दिवसांकरीता शासन पत्र, नगर विकास विभाग, दिनांक २२.०७.२०१६ (३दिवस) वाढविण्यात आलेले असल्यामुळे, सदर वाढलेल्या कालावधी करिता रू. ८,९२,५००/- (रुपये आठ लक्ष ब्याण्णव हजार पाचशे फक्त) इतकी रक्कम वनामती संस्थेस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी वसंतराव नाईक, राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांना वितरीत करण्यासाठी सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर खर्च मागणी क्र. एफ-३, “२२५१, सचिवालय-सामाजिक सेवा ००३, प्रशिक्षण (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (२२५१०९९१) ५०, इतर खर्च” या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदींमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७.०४.२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-चार, अ.क्र.१० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३३१११११४४९३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.31 11:13:52 +05'30'

**(ज.ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
५) महालेखापाल(लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
६) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -, मुंबई/ नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९) वसंतराव नाईक, राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
१०) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अर्थसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई
११) कक्ष अधिकारी (नवि-४/१४/२९/३१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती, (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.